**यात्रा, उत्सव इत्यादि प्रसंगी**
**घेण्यात यावयाची दक्षता**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग (विशेष)
शासन परिपत्रक क्रमांक : एमआयएस-०२०५/प्र.क्र १/विशा-१(अ),
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : ७ मार्च, २००५.

**पार्श्वभूमी :-** मौजे मांढरादेवी, ता. वाई, जि. सातारा येथे दि.२५.१.०५ रोजी काळेश्वरी देवीच्या यात्रेत झालेल्या चेंगराचेंगरीच्या घटनेची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून कोणती दक्षता घ्यावी. तसेच मोठया संख्याच्या यात्रा सुरळीत पार पाडण्याकरीता करावयाच्या उपाययोजना कोणत्या असाव्यात याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. याबाबत संबंधितांनी आवश्यक ती काळजी घेण्याबाबत पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना प्रसृत करण्यात येत आहे :-

१) जिल्हा विशेष शाखेकडील अधिकारी व कर्मचा-यांकडून तसे घातपातविरोधी पथकाकडून देवस्थान परिसर, मंदिर व मिरवणूकीचा मार्ग तपासणी करुन घ्यावा.

२) मिरवणूक दरम्यान तसेच भाविकांचे दर्शनाचे रांगेत, स्नानचे ठिकाणी, बस स्टँड इ. ठिकाणी समाजविघातक कृत्य करणारे, पाकिटमारी करणारे इसमांवर ठेवणेकामी स्थानिक गुन्हे शाखेकडिल कर्मचा-यांची नेमणूक करावी.

३) नो पॉकिंग झोन घोषित करण्यासाठी अधिसूचना जाहीर करावी.

४) महत्वाच्या ठिकाणी पोलीस चौक्या उभारुन त्यात बिनतारी संच, रोप बॅटरी व राखीव स्टाफ नेमावा.

५) व्हीडीओ ग्राफर यांना गर्दीतील हालचालींचे चित्रीकरणे करण्यासाठी नेमण्यात यावे.

६) ध्वनीक्षेपणाद्वारे अगर मेगाफोनद्वारे भाविकांना सूचना देणे.

७) काही अनुचित प्रकार घडण्याची शक्यता विचारात घेऊन त्यावेळी करावयाच्या कार्यवाहीसाठी आपत्कालीन योजना (Action Plan) तयार करण्यात यावा व सर्व अधिकारी व कर्मचा-यांना हयाप्रमाणे अवगत करुन त्याची रंगीत तालीम घेण्यात यावी.

८) मिरवणक मार्गाची अधिसूचना जाहीर करण्यात यावी.

९) मंदिरात प्रदेश करण्याच्या ठिकाणी बिनतारी संदेश विभागाकडून धातूशोधक (डी.एफ.एम.डी.) बसवून घ्यावेत.

१०) भाविकांना मंदिरात सोडताना टप्प्या-टप्प्याने सोडण्यात यावे.

११) मंदिरात प्रवेश घेण्यासाठी व बाहेर पडण्यासाठी दोन वेगवेगळे मार्ग असावेत.

१२) गर्दीच्या मार्गावर मनोरा उभारुन तेथून दुर्बिणीद्वारे गर्दीतील हालचालींवर लक्ष ठेवण्यात यावे व तसा अनुचित प्रकार आढळल्यास नजिकच्या पोलीस अधिकारी/कर्मचा-यांशी संपर्क साधून तात्काळ कार्यवाही करावी.

१३) गर्दीचे ठिकाणी मोकाट जनावरे फिरणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

१४) यात्रेत घडणा-या घडामोडी बाबत वेळोवेळी माहिती पोलीस ठाण्यात देण्यात यावी व पोलीस ठाणे अंमलदार यांनी नियंत्रण कक्षास कळवावी.

१५) जर अपघात झाला तर कायदा व सुव्यवस्था परिस्थिती निर्माण होऊन चेंगराचेंगरी होऊ शकते म्हणून गर्दीत कोणीही चारचाकी/दुचाकी वाहने नेणार नाही याची दक्षता घ्यावी.

१६) पोलीस विभागाने यात्रेदरम्यान महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, देवस्थान ट्रस्ट, राज्य परिवहन महामंडळ, प्रादेशिक मोटार परिवहन, ग्रामपंचायत/ नगरपालिका सदस्य, नागरिक तसेच जिल्हयातील गृहरक्षक दल, स्वेच्छेने काम करणा-या अशासकीय संस्था यांचेशी समन्वय ठेवावा, त्यांचेबरोबर वेळोवेळी बैठका घेण्यात याव्यात.

१७) यात्रेदरम्यान अवैध धंदे चालणार नाही याची दक्षता घ्यावी व आढळून आल्यास त्यांचेवर तात्काळ कार्यवाही करावी.

१८) मंदिर, दर्शनमार्ग,परिसर हा बी.डी.डी.डी.एस.कडून तपासणी करुन घ्यावा.

१९) मंदिर परिसराचे आसपास कोणत्याही प्रकारे दारुकाम (फटाके) किंवा आतषबाजी होणार नाही याची दक्षता घ्यावी.

२०) सोबत परिशिष्ठ-अ मध्ये जी पडताळणी यादी (चेकलि दिली आहे त्यानुसार सर्व बार्बींची परिपूर्तता झाली आहे कां याची दक्षता सर्व यंत्रणां घ्यावी व आपल्या कार्यालय प्रमुखांना व पोलीस यंत्रणेस तसा अहवाल पाठवावा.

२१) अशा यात्रा,उत्सव व सण याची दिनदर्शिका (कॅलेंडर) जिल्हाधिका-यांकडून तयार करुन त्याची प्रत शासनास पाठवावी.

३. उपरोक्त सूचनांना अनुसरुन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अखत्यारितील सर्वसंबंधित विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना आवश्यक त्या सूचना द्याव्यात. तसेच मांढरदेवी दुर्घटनेबाबत प्रस्तावित करण्यात आलेल्या न्यायालयीन आयोगाच्या शिफारशी प्राप्त होताच यासंदर्भात सुधारित सूचना निर्गमित करण्यात येतील.

( प्र. बा. हिर्लेकर )
उप सचिव

प्रत :-
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त/सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक (परिक्षेत्र)/सर्व पोलीस अधीक्षक.
महासंचालक, गृहरक्षक दल व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट - अ

## पडताळणी यादी (चेकलिस्ट)

१) रस्ता रुंद आहे का ?

२) भाविकांच्या येण्या-जाण्याचे स्वतंत्र मार्ग आहेत का ?

३) वाहतूकीची व्यवस्था करण्यात आली आहे का ?

४) आणीबाणीच्या परिस्थितीसाठी हॉट लाईन वायरलेस उपकरणांची व्यवस्था आहे/नाही.

५) नियंत्रण कक्ष व सी.सी.टि.व्ही. ची यंत्रणा सुसज्ज आहे/नाही.

६) आपत्कालीन मार्ग आहे/नाही

७) बॅरेक्सची व्यवस्था पुरेश व मजबूत आहे/नाही.

८) पोलीस दल, गृहरक्षक दल स्वयंसेवक उपलब्ध आहे/नाही.

९) नारळ फोडण्याची स्वतंत्र जागा नेमली आहे/नाही.

१०) कत्तलखान्याची व्यवस्था केली आहे/नाही.

११) भाविकांच्या पिण्याच्या पाण्याची सोय केली आहे/नाही.

१२) स्वच्छता व्यवस्था व प्रसाधन गृहाची व्यवस्था केली आहे/नाही.

१३) तात्पुरती दुकाने लावण्यासाठी सुरक्षित अंतराची मर्यादा ठेवली आहे/नाही. सदर दुकानांना तात्पुरते परवाने दिले आहे/नाही.

१४) भाविकांच्या वाहतुकीसाठी एस.टी. व्यवस्था करण्यात आली आहे/नाही.

१५) वाहने पार्किंगची व्यवस्था केली आहे/नाही.

१६) वाहतुकीचा ओघ नियंत्रित करण्यासाठी यंत्रणा उभी करण्यात आली आहे/नाही.

१७) सुरक्षित विद्युत पुरवठा करण्यात आला आहे/नाही.

१८) अग्निरोधक यंत्रणा उपलब्ध आहे/नाही.

१९) रुग्णवाहिकेसह सुसज्ज वैद्यकिय कुमक उपलब्ध आहे/नाही.

२०) उपहारगृहे, हॉटेल व अन्य खादय पदार्थांच्या दुकानात भेसळयुक्त पदार्थ नाहीत याची खात्री केली आहे/नाही.

---